राष्ट्रीय मानीव हक्क आयोगाच्या शिफारसी-
नुसार मृत न्यायाधिन बंदी श्री. प्रताप
महादेवराव शिंदे यांच्या अवलंबितांना
रु. २,००,०००/- [रु. दोन लाख फक्त]
एवढया रक्कमेची नुकसानभरपाई मंजूर करण्याबाबत

महाराष्ट्र शासन
गृह विभाग.

शासन निर्णय क्रमांक- एमआयएस-०१२०/४[२०]/पीआरएस-२
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२, दिनांक ६ मार्च, २०००.

वाचा:- सहाय्यक प्रबंधक [विधि] राष्ट्रीय मानवी हक्क आयोग [विधि विभाग] नवी दिल्ली यांचे इंग्रजी पत्र क्रमांक-३६/१३[५७]९६/एलडी दिनांक ४.१.२०००

शासन निर्णय:- कल्याण जिल्हा कारागृहातील न्यायाधीन बंदी श्री. प्रताप महादेवराव शिंदे यांच्या कारागृहीन मृत्युच्या संदर्भात राष्ट्रीय मानीव हक्क आयोगाने राज्य शासनास मृत न्यायाधीन बंदयाच्या अवलंबितांना रु. २,००,०००/- [रु. दोन लाख फक्त] एवढी रक्कम नुकसान भरपाई म्हणून एक महिन्याच्या आत अदा ~~करावी~~ करावी अशी शिफारस केली आहे व त्याप्रमाणे मृत न्यायाधीन बंदी श्री.प्रताप महादेवराव शिंदे यांच्या अवलंबीतांना रु. २,००,०००/- [रु. दोन लाख फक्त] एवढी रक्कम नुकसान भरपाई म्हणून अदा करणे आवश्यक आहे.

मृत न्यायाधीन बंदी श्री. प्रताप महादेवराव शिंदे यांच्या अवलंबितांना रु.२,००,०००/ [रु. दोन लक्ष फक्त ~~फक्त~~] एवढी रक्कम आकस्मिकता निधितून अग्रिम म्हणून ~~xx~~ हया आदेशान्वये कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्या स्वाधीन करण्यात येत आहे. ~~xx~~ ही रक्कम त्यांनी मृत न्यायाधिन बंदी श्री. प्रताप महादेवराव शिंदे यांच्या अवलंबितांस दि. २००० पूर्वी अदा करावी.

वरीलप्रमाणे रु. २,००,०००/- [रु. दोन लाख फक्त ] एवढा येणारा खर्च मागणी क्रमांक-७, २०५६-तुरुंग-१०१ [दोन] जिल्हा तुरुंग-२० इतर खर्च ~~xxxx~~ [ २५६०१६२] योजनेत्तर [भारीत] या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व हा खर्च आकस्मिकता निधितून मंजूर करण्यात आलेल्या अग्रीमातून भागविण्यात यावा. आकस्मिकता निधि अग्रिमातून करावयाच्या खर्चासंबंधी देयके काढताना या संगणक संकेतांकाचा वापर करावा. आकस्मिकता निधि अग्रिमाची प्रतीपूर्ती करण्यासाठी पूर्ण रक्कमेची पूरक मागणी आगामी अधिवेशनात रितसर सादर करण्यांत येईल.

नियंत्रक अधिका-यांना असेही कळविण्यांत येते की, त्यांनी आकस्मिकता निधि खर्च करण्यासाठी आहरण व संवीतरण अधिका-याकडे रक्कम ~~xx~~ सुपूर्द करण्यासंबंधिच्या आदेशात आगाऊ रक्कमेतून खर्च करताना सादर करण्यांत येणा-या देयकावर "आकस्मिकता निधि अग्रिम शासन ज्ञापन, वित्त विभाग क्रमांक आकनि. ११००/२३५/अर्थसंकल्प-२०

असे लाल शाईने लिहावे अशी स्पष्ट सूचना अंतर्भूत करावी व ही सूचना ... अधोरेखीत करावी. तसेच आकस्मिकता निधीतून काढलेल्या अग्रिमातून करावयाच्या खर्चाबाबत महाराष्ट्र अर्थसंकल्पीय नियमपुस्तिकेतील प्रकरण १६ मध्ये विशद केलेल्या नियमांचे व वित्त विभाग परिपत्रक क्रमांक-सीएनएफ/सीएलएफ-१०८३/१४०/अर्थसंकल्प-३ दिनांक २६ एप्रिल १९८३ व परिपत्रक क्रमांक सीएनएफ-१०८६/१५/अर्थसंकल्प-३, दिनांक २८.४.८६ अन्वये देण्यात आलेल्या सूचनांचेही काटेकोरपणे पालन करण्यात यावे. तसेच अग्रिमातून प्रत्यक्ष केलेल्या खर्चाची एकत्रित माहिती त्यांनी त्या महिन्यानंतर १५ तारखेपर्यंन्त वित्त विभाग [अर्थसंकल्प-३] मंत्रालय, मुंबई यांना पाठवावी व त्याची एक प्रत मा. अपर मुख्य सचिव [गृह] गृह विभाग मंत्रालय, मुंबई ४०० ०३२ यांचेकडे पाठविण्यात यावी.

हा निर्णय वित्त विभागाच्या ~~सहमती~~ सहमतीने व त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक सीआर-१२०/२०००/व्यय-८, दिनांक २८.१.२००० अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

[ गु. ज. कुलकर्णी ]
कार्यासन अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन.

प्रति,

~~महा~~ कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे.
कारागृह उपमहानिरीक्षक [मुख्यालय]पुणे/पश्चिम विभाग, पुणे/मध्य विभाग.
औरंगाबाद/पूर्व विभाग, नागपूर/दक्षिण विभाग, मुंबई.
अधिक्षक कल्याण जिल्हा कारागृह कल्याण.
महालेखापाल-१/२ [लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षा] मुंबई/नागपूर.
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
निवासी लेखा अधिकारी, मुंबई.
कोषागार अधिकारी, ठाणे.
सहसंचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासन भवन ५ वा मजला मुंबई [दोन प्रती]
वित्त विभाग [व्यय-८/अर्थसंकल्प-३/१०]
गृह विभाग, बीयुडी-१
निवडनस्ती.